**पिंपरी चिंचवड महानगरपालिकेस मुळा नदीच्या पुनरुज्जीवन करण्याच्या अनुषंगाने विविध विकास प्रकल्प राबविण्यासाठी कर्जरोखे उभारण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण-२०२३/प्र.क्र.१७/नवि-३३**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक :- ०३ मार्च, २०२३**

**संदर्भ :-**

आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. लेखा/२६/कावि/२२६/२०२२ दिनांक १६ डिसेंबर, २०२२.

**प्रस्तावना :-**

पिंपरी चिंचवड शहरातील मुळा नदीच्या पुनरुज्जीवन करण्याच्या अनुषंगाने विविध विकास प्रकल्प राबविण्यासाठी रुपये २०० कोटींचे कर्जरोखे उभारणेस मान्यता देण्याचा प्रस्ताव आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये शासनाकडे सादर केला होता. त्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पिंपरी चिंचवड शहराच्या मुळा नदीचे पुनरुज्जीवन करण्याच्या अनुषंगाने प्रकल्प राबविण्यात येणार आहे. यासाठी साधारणतः रुपये ७५० कोटी खर्च अपेक्षित आहे. त्यानुषंगाने सदर प्रकल्पासाठी पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या स्थायी समितीने व महापालिका सभेने मुळा नदी प्रकल्पासाठी रुपये ७५० कोटी अंदाजपत्रकीय रकमेस मान्यता दिलेली आहे. त्यास अनुसरून सदर प्रकल्पाच्या अनुषंगाने प्रारंभिक टप्प्यात रुपये २०० कोटीपर्यंत कर्जरोखे उभारण्यास महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम १०९ नुसार या कलमामधील अटी व खालील अटींसह राज्यशासनाची मान्यता देण्यात येत आहे.

१. रोख्यांद्वारे उभारण्यात येणारी कर्ज रक्कम व त्यावरील व्याजाची परतफेड करण्याची जबाबदारी पूर्णतः पिंपरी चिंचवड महानगरपालिकेची राहील. **यासाठी राज्य शासनाची कोणतीही हमी राहणार नाही**.

२. कर्जरोख्यांच्या परतफेडीसाठी महानगरपालिकेने **राष्ट्रीयकृत बँकेत एस्क्रो खाते** (Escrow Account) **उघडून परतफेड वेळेत होईल** याची दक्षता घ्यावी. त्यासाठी शासनाकडून कोणतेही सहाय्य करण्यात येणार नाही.

३. कर्जरोख्यांची उभारणी व त्याची परतफेड याबाबतचा अहवाल महानगरपालिकेने वेळोवेळी शासनास सादर करावा.

४. सदर कर्जरोखे ज्या प्रयोजनासाठी उभारण्यात येणार आहेत त्याच प्रयोजनासाठी त्याचा उपयोग करणे आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका यांना बंधनकारक राहील.

५. सदर प्रकल्पाच्या मान्यतेनंतर सर्व कायदेशीर बाबींची पूर्तता करणे बंधनकारक राहील. तसेच, शासनाच्या संबंधित विभागांनी निश्चित केलेल्या विविध नियम, विनियम, अटी व शर्ती यांची पूर्तता केल्यानंतरच पुढील आवश्यक कार्यवाही करणे आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिकेस बंधनकारक राहील.

६. पिंपरी चिंचवड महानगरपालिकेस प्रारंभिक टप्प्यात रुपये २०० कोटी रक्कमेच्या मर्यादेत कर्ज उभारणेस शासनाची ना हरकत असली तरी, कर्जाची प्रत्यक्ष उचल आवश्यकतेनुसार करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३०३१२५०००५६९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

SHRIKANT C ANDGE

Digitally signed by SHRIKANT C ANDGE
DN: cn=SHRIKANT C ANDGE, o=Mantralaya, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, email=shrikant.andge@nic.in, c=US
Date: 2023.03.03 13:04:55 +05'30'

**( श्रीकांत चं. आंडगे )**
**उप सचिव, नगर विकास विभाग**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उप मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२) मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी चिंचवड.
५. निवडनस्ती, नवि-३३.